**महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (म.) मुंबई या महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता व्यवस्थापकीय अनुदान (३६-सहायक अनुदाने-वेतन) मंजूर करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक- संकीर्ण २०२१/प्र.क्र.८६/महामंडळे,**

मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- ७ मार्च, २०२२.

वाचा :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२८/०१/२०२२.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०३/०२/२०२२.

**शासन निर्णय** :-

महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.) मुंबई मार्फत अनुसूचित जातीच्या नवबौध्द घटकांच्या आर्थिक उन्नतीसाठी विविध योजना राबविण्यात येतात. या महामंडळास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता वेतनावरील खर्च भागविण्याकरिता ३६-सहायक अनुदाने (वेतन) यासाठी रु.१०,००,०० हजार (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) एवढी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

२. यापैकी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर ९५% च्या मर्यादेत वितरित करावयाची वितरणासाठी शिल्लक प्रस्तावित तरतुद रक्कम रु. ३,५०,०० हजार (अक्षरी रुपये तीन कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे:-

१) योजनेतर निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत.

२) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.

३) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

४) महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.

५) कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

३. या व्यवस्थापकीय अनुदानाबाबत उप सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाही करिता प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नवी मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ यांस संवितरित करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

४. या बाबींवरील खर्च “मागणी क्रमांक एन-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण, ०१ अनुसूचीत जातीचे कल्याण, ८०० इतर खर्च (०९) (०१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.) मुंबई यास सहायक अनुदाने (२२२५ २३०८) ३६-सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२८/०१/२०२२, वित्त विभाग, शासन निर्णय क्र अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०३/०२/२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०७१४५८४५४७२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DADA NAMDEV KOKADE

Digitally signed by DADA NAMDEV KOKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSITANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=81a9fee3e4fab545aa40bccc4ad46860efda515529664997a6109103e96f41e3, pseudonym=11F7570D4AD03CA9BC03A2C509E88C40A45864CC, serialNumber=D68C50095DDB3F1662543F4BA76407E09A62E57DC68B1B1DA9B6922646458AAE, cn=DADA NAMDEV KOKADE
Date: 2022.03.07 15:32:27 +05'30'

**(दादा कोकडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उप सचिव / अवर सचिव (महामंडळे), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, नवी मुंबई (दोन प्रती)
४. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.) मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, / जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,/ठाणे.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८. अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
९. वित्त विभाग, (का. व्यय १४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ), मंत्रालय, मुंबई.
१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई,
११. कार्यासन-अर्थसंकल्प, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. निवड नस्ती- कार्यासन (महामंडळे)